हरीत संकल्पना योजना.

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग
शासन निर्णय क्रमांक :- इएनव्ही -२०१९/प्र.क्र.५९/तां.क.३
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक - १० जानेवारी, २०२०

वाचा -

१) या विभागाचा शासन निर्णय क्रमांक इएनव्ही -२०१९/प्र.क्र.५९/तां.क.३, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१९/प्र.क्र.९२/अर्थ - ३, दिनांक ०८/०७/२०१९.

प्रस्तावना -

शासनाच्या दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये हरित संकल्पना योजनेतंर्गत काही अटी व शर्तींच्या अधीन राहून श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद, महिला आर्थिक विकास महामंडळ व जय बजरंगबली व्यायाम मंडळ एकलारा, ता.मुखेड, जि.नांदेड या संस्थेंचे प्रस्ताव मंजूर करण्यात आले होते. सदर मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद यांनी अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याने सदर संस्थेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

शासनाच्या दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये हरित संकल्पना योजनेतंर्गत काही अटी व शर्तींच्या अधीन राहून श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद, महिला आर्थिक विकास महामंडळ व जय बजरंगबली व्यायाम मंडळ एकलारा, ता.मुखेड, जि.नांदेड या संस्थेंचे प्रस्ताव मंजूर करण्यात आले होते. सदर मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद यांनी अटी व शर्तींची पूर्तता केलेली असल्याने त्यांना या शासन निर्णयान्वये मंजूर राज्य शासनाचा हिस्सा (७५%) रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) इतका निधी मुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग (Section officer, Environment Department) यांचे नांवे १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा व त्यानुसार श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद यांना स्वतंत्ररित्या धनादेशाव्दारे अदा करण्यात यावी.

३. उपरोक्त अदा करावयाचे रू. १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून संबंधितांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीम. शिल्पा चं. शिर्के, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सु.कि. निकम, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांना श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद यांना वितरित करावयाचे एकूण रू. १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून एकत्रित धनादेशाव्दारे वितरित करण्यासाठी प्राप्त करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर होणारा खर्च मागणी क्र. यू-३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण व प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (१३) पर्यावरणविषयक जनजागृती शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५१३०२), ३१ सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावी व तो सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१९-२० या वर्षात सदर लेखाशिर्षाखाली रुपये ५,००,००,०००/- (अक्षरी रु. पाच कोटी फक्त) एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. अर्थसं - २०१९/प्र.क्र.९२/अर्थ - ३, दिनांक ०८/०७/२०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर संस्थेला मागील ३ महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही. तसेच सदर संस्थेकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

७. शासनाच्या दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट “अ” मधील अटी व शर्तींची पूर्तता करणे श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद या संस्थेला बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११०१५५९१९१८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Chandrakant Arun Vibhute

Digitally signed by Chandrakant Arun Vibhute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8f5db4b58117f82ba510cc5eb279fa4eba706b24f6f921a77c28a792940c5517, serialNumber=b37242131913ce4ad7ffa0caa314c8163271f8af6410b5dff1fc5b4c3cc19b76, cn=Chandrakant Arun Vibhute
Date: 2020.01.10 15:48:34 +05'30'

**(चंद्रकांत विभूते)**
**अवर सचिव, पर्यावरण विभाग**

**प्रत,**

१) जिल्हाधिकारी, औरंगाबाद
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा, महाराष्ट्र १ / २, मुंबई /नागपूर)
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) श्रीकृष्ण शिक्षण प्रसारक मंडळ, औरंगाबाद
६) मा. मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) वित्त विभाग कार्यासन क्र.व्यय १६, अर्थसंकल्प ७, मंत्रालय, मुंबई.३२
१०) नियोजन विभाग कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मुंबई
११) प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद.
१२) रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती.